आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) प्रकल्पास निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक-०६२१/प्र.क्र.१०६/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ४ जानेवारी, २०२२

**वाचा:-** १) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक कृपमं-०११८/प्र.क्र.१३/ २१-स, दिनांक ३०.९.२०२०.
२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक योजना-१०२०/ प्र.क्र.१८३/२१-स, दिनांक ०९.१०.२०२०.
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.७८/अर्थ-३, दिनांक २०.०७.२०२१
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१

**प्रस्तावना :-**

आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (Maharashtra Agribusiness Network-MAGNET) राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये ६ वर्षासाठी (सन २०२० ते २०२६ पर्यंत) राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणी करिता संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) संस्था स्थापन करण्यात आलेली आहे. या प्रकल्पांतर्गत एकूण US $ १४२.९ दशलक्ष (सुमारे रु.१०००.०० कोटी) इतक्या निधीपैकी ७०% निधी (US $ १०० दशलक्ष) आशियाई विकास बँकेकडून अल्प व्याज दराच्या कर्ज स्वरुपात व ३०% निधी (US $ ४२.९ दशलक्ष) राज्य शासनाच्या स्वनिधीतून गुंतवणूक करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. मॅग्नेट प्रकल्पासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याकरिता रुपये ३३००.०० लाख व बाह्य हिश्श्याकरिता रुपये ७७००.०० लाख असे एकूण रुपये ११०००.०० लाख एवढा नियतव्यय राखून ठेवण्यात आला होता. त्यापैकी जूलै, २०२१ च्या पावसाळी अधिवेशनात मॅग्नेट प्रकल्पासाठी राज्य हिश्श्याकरिता रुपये २६४०.४० लाख व बाह्य हिश्श्याकरिता रुपये ६१८३.४० लाख अशी एकूण रुपये ८८२३.८० लाख एवढया रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आलेली आहे. पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या रक्कमेपैकी मॅग्नेट प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता पहिला हप्ता राज्य हिश्श्याकरिता रुपये १२५९.०० लाख व बाह्य हिश्श्याकरिता रुपये २८३५.०० लाख असे एकूण रुपये ४०९४.०० लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्पासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता प्रकल्पांतर्गत विविध समाविष्ट घटकांचा खर्च भागविण्यासाठी सन २०२१ च्या पावसाळी अधिवेशनातील पुरक मागणी अन्वये मंजूर राज्य हिश्श्याखाली रु.१२५९.०० लाख व बाह्य हिश्श्याखाली रु.२८३५.०० लाख असे एकुण रु.४०९४.०० लाख इतकी रक्कम (पहिला हप्ता ) प्रकल्पास उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा:-

| **अ.क्र** | **लेखाशिर्ष** | **मंजूर निधी (रुपये लाखात)** |
|---|---|---|
| १ | **मागणी क्र व्ही -३**<br>४४३५ - इतर कृषीविषयक कार्यक्रमांवरील भांडवली खर्च<br>(०१), पणन व गुणवत्तानियंत्रण<br>(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका<br>(०१)(०१)आशियाई विकास बँक सहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) (राज्य हिस्सा ३० टक्के)<br>**(४४३५ ००४८)**<br>५४-गुंतवणूका | रु.१२५९.००<br>(रुपये बारा कोटी एकोणसाठ लाख फक्त) |
| २ | **मागणी क्र व्ही -३**<br>४४३५ - इतर कृषीविषयक कार्यक्रमांवरील भांडवली खर्च<br>(०१), पणन व गुणवत्तानियंत्रण<br>(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका<br>(०१) (०२) आशियाई विकास बँक सहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) (बाह्य हिस्सा ७० टक्के)<br>**(४४३५ ००५७)**<br>५४-गुंतवणूका | रु.२८३५.००<br>(रुपये अठ्ठावीस कोटी पस्तीस लाख फक्त) |

३. उपरोल्लिखित निधी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन त्याचे वितरण करण्यासाठी श्री. सु.सं. धपाटे, सह सचिव (पणन) (V००१०), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई (V००१०) यांना नियंत्रण अधिकारी व श्री.सु.ल. काठोळे, कार्यासन अधिकारी(रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथुन आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

४. या प्रकल्पाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी RTGS सुविधेद्वारे प्रकल्पाच्या बँक खात्यावर जमा करावयाचा असून त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| बँकेचे नाव | बँक ऑफ इंडिया, स्वारगेट शाखा, पुणे-०९ |
| खात्याचे वर्णन | MAGNET SOCIETY PMU |
| खाते क्रमांक | **050820110000820** |
| IFSC CODE | **BKID0000508** |

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ज्या कारणास्तव मंजुर केलेला आहे त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

६. प्रकल्प संचालक यांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची आशियाई विकास बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

७. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दिनांक १४.१०.२०२१ नुसार विहीत केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने सदर परिपत्रकान्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७२/१४३१, दिनांक १२.०८.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५३९/२०२१/व्यय-२, दिनांक ०१.१२.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०१०५१००३५२४६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2022.01.05 10:05:07 +05'30'

**( डॉ.सुग्रिव सं.धपाटे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (सहकार व पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.राज्यमंत्री ( पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. सह सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग ,मंत्रालय, मुंबई.
५. प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था, पुणे.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/ऋण व हमी कक्ष ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (१७-स/रोख शाखा) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती (२१-स)